**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३१८/प्र.क्र.५७/का-नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- २१ सप्टेंबर, २०२०.

**वाचा :-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०५/का-९ , दि. १८.०८.२०१७.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, परभणी जा.क्र.आस्था/ब-४/५४४५/२०२०, दि.२९.०७.२०२० चे पत्र.
३) जिल्हा न्यायालय, सोलापूर जा.क्र. आस्था/ब-४/४८४/२०२०, दि.०५.०८.२०२० चे पत्र.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०.

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत एकूण १८ अतिरिक्त न्यायालये स्थापन केलेली आहेत. या १८ अतिरिक्त न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या १८ अतिरिक्त न्यायालयासाठीच्या अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. त्यानुसार संबंधित जिल्हा व सत्र न्यायालयांकडून शासनास प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. संदर्भीय अ.क्र.४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर १८ अतिरिक्त न्यायालयासाठीची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयासाठीच्या पुढील अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

जिल्हा न्यायाधीश/तदर्थ जिल्हा न्यायाधीश संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | न्यायाधीश | १४ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १४ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १४ |
| ५ | शिपाई | १४ |
| | **एकूण पदे** | ७० |
| ठोक वेतनावर बाह्ययंत्रणेद्वारे शिपाई -१४ | | |

दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर | ४ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| ५ | शिपाई | ४ |
| | **एकूण पदे** | २० |
| ठोक वेतनावर बाह्ययंत्रणेद्वारे शिपाई -४ | | |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५-दिवाणी व सत्र न्यायालये (०७) अतिरिक्त न्यायालये (०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (२०१४ ०५७५), या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०२०-२०२१ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२५१५२०२८९६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.09.25 15:21:57 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,

२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई

३) मुख्य महानगर न्यायदंडाधिकारी, मुंबई

४) जिल्हा व सत्र न्यायालय, सोलापूर, अमरावती, परभणी, पुणे, नागपूर, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,नाशिक, औरंगाबाद.

५) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

६) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,

९) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर, अमरावती, परभणी, पुणे, नागपूर, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा, नाशिक, औरंगाबाद.

१०) वित्त विभाग व्यय-५,

११) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५

१२) निवड नस्ती- का. ९.